# षट्चक्र-दर्शन व भेदन


लेखक

कै. डॉ. श्रीपाद महादेव वैद्य

एल्. एम्. ॲन्ड एस्.

मु. इस्लामपूर, जिल्हा सातारा


किंमत ६० रुपये

तुकाराम बुक डेपो

माधवबाग, मुंबई - ४०० ००४

**प्रकाशक :**
**महेंद्र मधुकर कस्तुर**
**तुकाराम बुक डेपो**
माधवबाग, मुंबई ४०० ००४.


**नवीन आवृत्ती : जून २००९**

**अक्षरजुळणी :**
अक्षय फोटोटाइपसेटर्स
१-चित्रकूट सोसायटी
डॉ. आंबेडकर मार्ग
ठाणे (पश्चिम) ४०० ६०१.

**मुद्रक :**
शिवानी प्रिंटर्स,
खाडीलकर मार्ग,
गिरगाव, मुंबई - ४०० ००४.

हट
राजयोगादि सर्व
ब्रह्मविद्वरिष्ठांचे चरणी
ही कमलसुमनांजली
अर्पण करीत आहे.

**ग्रंथकर्ता**

# प्रस्तावना

परमेश्वर कृपेने या ग्रंथाचे लेखन पुरे होऊन हा प्रसिद्ध करण्याचा काल आला आहे. या ग्रंथाचे २ भाग करण्यांत आले आहेत. पहिल्या भागांत ८ प्रकरणें आहेत. हा भाग शास्त्रीय विषयाचे विवरणाचा आहे. त्यामध्ये योगशास्त्रामध्ये वर्णन केलेली षट्चक्रें कोणती आहेत त्याचे व शरीरशास्त्राचे तुलनात्मक सूक्ष्म विवरण आहे. हा अगदी नवीन संशोधनात्मक असा प्रयत्न आहे. दोन्ही शास्त्रांची वर्णने अगदी तंतोतंत कशी जुळतात हे विषय वाचल्यावर सहज ध्यानी येईल. वेदांत शास्त्रदृष्ट्या व मंत्रशास्त्र दृष्ट्या या षट्चक्रांची माहिती देण्यांत आली आहे.

या भागांतील शास्त्रीय विषयांचे संपूर्ण आकलन कदाचित् सर्वांना होणारे नाही. षट्चक्रांच्या दलाचे वर्णन शरीरशास्त्रानुरूप केले आहे. त्यांत इंग्रजी व शास्त्रीय शब्द बरेच असल्यामुळे सामान्य वाचकास ते दुर्बोध होतील. तो विषय त्यांनी सोडला तरी बाकीचा बहुतेक विषय नवीन ज्ञानप्राप्ति करून देणारा व जिज्ञासा तृप्त करणारा आहे. तो सर्वांस कळण्याजोगा आहे. तो वाचल्यावर एक गोष्ट सहज लक्षांत येईल की षट्चक्रांचे वर्णन काल्पनिक नसून ते शुद्ध पायावर पूर्वजांनी करून ठेवले आहे व ते अनुभवाने लिहिले आहे.

या ग्रंथाचा दुसरा भाग हा सर्व वाचकांकरितां आहे. तत्त्वज्ञानाचा विषय हा थोडा अवघड असणारच. पण कोणत्याही भूमिकेवर असणाऱ्या वाचकांना आकलन करितां

यावे अशा प्रकारे तो लिहिण्यांत आला आहे. बुद्धिप्रामाण्यास पटेल, अशा प्रकारे याची मांडणी केली आहे. यांत प्रतिपादिलेले विषय चिकित्सक बुद्धीचे कसोटीवर घासून घ्यावे, त्याचा अभ्यास करून अनुभव घेऊन पहावा. म्हणजे त्यांतील रहस्याचा व आनंदाचा स्वाद घेतां येईल.

दुसऱ्या भागांत ४ प्रकरणे आहेत पण यांत ग्रंथाची निम्मी पाने खर्ची पडली आहेत.

प्रकरण ९ मध्ये अजपाजपाची पूर्ण माहिती दिली असून त्याचे तात्त्विक विवेचन करण्यांत आले आहे. शास्त्रोक्त जप कसा असावा ही माहिती सुद्धां दिली आहे.

प्रकरण १० वे अत्यंत महत्त्वाचे आहे. अजपाजपाचा अभ्यास कसा करावा याचे विस्तृत वर्णन असून त्या अभ्यासाने चक्रभेदन कसे होते हे सांगितले आहे. या प्रकरणांत कुंडलिनीबद्दल संपूर्ण माहिती दिली असून ती आत्मज्ञानावर प्रकाश पाडणारी आहे. हा विषय अगदी नवीन आहे. कुंडलिनीचे रहस्याचे सूक्ष्म धागे हळूहळू उकलून दाखविण्यांत आले आहेत. हिचे खरे स्वरूप काय आहे याचे विवेचन ज्ञानेश्वरीचे आधाराने केले आहे. अतींद्रिय ज्ञान कसे होते व साक्षात्काराचे मार्गांतील अनुभव कसकसे येतात याचे दिग्दर्शन करण्यांत आले आहे. त्याचा अनुभव घेऊन पहावा.

साक्षात्कार हा योगाचाच विषय नसून मनोलयाच्या कोणत्याही अभ्यासाने तो प्राप्त करून घेता येतो हे सहज दृष्टोत्पत्तीस येईल. हा अभ्यासाचा विषय असल्यामुळे सर्वांनी

अभ्यास करून पहावा म्हणजे यांतील रहस्य आपोआप कळू लागेल.

प्रकरण ११ मध्ये अष्ट महासिद्धि व उपसिद्धि यांचे वर्णन दिले आहे.

शेवटचे प्रकरण हा साक्षात्काराचे मार्गावरील शेवटचा टप्पा आहे. यांत एक महत्त्वाचा अभ्यास दिला आहे. अनुहतध्वनीची संपूर्ण माहिती दिली असून परब्रह्म स्वरूपाचे थोडक्यांत दिग्दर्शन केले आहे. साक्षात्काराचे अनुभवस्वरूपांत सद्गुरुची, चिदंबररूपाची पूजा करण्यांत येऊन ग्रंथ समाप्ति झाली आहे.

परमेश्वराने जसे जसे जेव्हां जेव्हां लिहून घेतले तसे तसे लेखन झाले आहे. यांत ग्रंथकर्त्याकडे कांही नाही. तोच कर्ता-करविता सर्व आहे ही पूर्ण जाणीव ठेवून त्याचेच ठिकाणी लीन होऊं.

विजया दशमी
शके १८५९

ग्रंथकर्ता

# निवेदन

योगशास्त्रांतील सूक्ष्म प्रमेये अत्यंत सुलभ रितीने सोप्या भाषेत पटवून देणारा "षट्चक्र-दर्शन व भेदन" हा ग्रंथ छापून बरीच वर्षे झाल्यामुळे दुर्मिळ झाला होता. पुष्कळ लोकांकडून या ग्रंथाची मागणी असल्यामुळे डॉ. बाळकृष्ण श्रीपाद वैद्य यांच्या परवानगीने आम्ही ही दुसरी आवृत्ती प्रसिद्ध करीत आहो. उत्तम छपाई, ग्लेज कागद व किंमतही अल्प असल्यामुळे योगशास्त्र जिज्ञासु सूज्ञ ग्राहकवर्ग पूर्वीप्रमाणे याही आवृत्तीला आश्रय देऊन आम्हांस कृतार्थ करील अशी आशा आहे.

मिती-
माघ शु. १५ शके १८८३
ता. १९-२-१९६२

**शिवराम नारायण कस्तुर**
मॅनेजर, मे. तुकाराम बुक डेपो
माधवबाग, मुंबई ४

## पाचवी आवृती

दुसऱ्या आवृत्तीप्रमाणेच कांही बदल न करता लवकरच आज पुनर्मुद्रणाचा सुयोग येत आहे तरी मार्मिक विद्वज्जनांनी या पुस्तकास उदार आश्रय द्यावा अशी नम्र विनंती आहे.

मिती-श्रावण कृष्ण ८ शके १८८९
गोकुळाष्टमी
२७-८-१९६७

**शिवराम नारायण कस्तुर**

# अधारभूत ग्रंथांची यादी

१ उपनिषदें

२ वेदांगे

३ हटयोगप्रदीपिका

४ घेरंडसंहिता

५ योगतारावली (श्रीमत् शंकराचार्य)

६ ज्ञानेश्वरी

७ भागवत

८ दासबोध

९ रामसोहळा (मेरुस्वामी)

१० दत्तमहात्म्य (श्री प. प. वासुदेवानंद सरस्वती)

११ शरीरशास्त्र /Anatomy

१२ इंद्रियविज्ञानशास्त्र/ Physiology

# अनुक्रमणिका

# चित्रांची सूची

# भाग पहिला

# षट्चक्र-दर्शन व भेदन

## प्रकरण १ ले

## विषय प्रवेश

**वंदेऽहं सच्चिदानंदम्। भावातीतं जगद्गुरुम्।।**
**नित्यं पूर्ण निराकारम्। निर्गुणं स्वात्मसंस्थितम्।।**
**परात्परतरं ध्यायेत्। नित्यमानंदकारकम्।।**
**हृदयाकाशमध्यस्थम्। शुद्धस्फटिकसन्निभम्।।**

पंच कर्मेंद्रिये, पंच ज्ञानेंद्रिये व मनबुद्ध्यादिक इत्यादिकांचा नियंता व प्रेरक आणि ज्याचे वास्तव्य मूलाधार चकावर मानले आहे अशा आत्मरूप बुद्धिदात्यास नमन असो! त्याचप्रमाणे हंसावर आरूढ होणारी प्रणवरूपिणी वागूदेवता तिलाही वंदन असो!

निर्गुण, निराकार, परेच्या पलीकडील, सच्चिदानंदरूप अशा सहस्रदलकमलामध्ये स्थित असलेल्या प्रकाशरूप व परब्रह्मस्वरूपी सद्गुरुपदाचे ठिकाणी एकात्मभावाने लीन असो!

अध्यात्मविद्येच्या मार्गावर असणाऱ्यांना, वेदांतशास्त्रांत पारंगतता मिळविणाऱ्यांना व आत्मस्वरूपाचा साक्षात्कार प्राप्त करून घेणाऱ्या अभ्यासी पुरुषांना षट्चक्रभेदन ह्या अत्यंत

कठीण विषयाकडे वळावे लागते. मूलाधारादि षट्‌चक्रांचे वर्णन योगशास्त्रांत व वेदांतशास्त्रांत केले आहे, ते काल्पनिक असावे अशी शंका येते; नाभिकमल, हृत्कमल वगैरे कमले कमलाकार आहेत व त्यास दले म्हणजे पाकळ्या आहेत अशी नुसती भावना करावयाची की काय? अशीही शंका येते; प्राण एक एक चक्रावरून वर जात जात शेवटी मस्तकांत जातो तो वायुरूपांत का शक्तिरूपांत जातो अशीही शंका येते; अशा अनेक शंका येणे साहजिक आहे. तरी या षट्‌चक्रांचे ज्ञान व रहस्य कळावे म्हणून हा अल्पसा प्रयत्न या पुस्तकरूपाने आम्ही करीत आहो. 'प्रणवोपासना' या ग्रंथामध्ये या चक्रांचा ओघरता उल्लेख आम्ही केला आहे. तिकडे लक्ष वेधून त्या ग्रंथाचे प्रस्तावनेत प्रसिद्ध वेदांती प्रो. रा. द. रानडे यांनी "या विषयाचे जास्त विस्तृत विवेचन अन्यत्र करावे" असे सूचित केले आहे. इस्लामपूर येथे 'ब्राह्मण' मासिक निघत असे. त्यामध्ये 'अजपाजप' या शीर्षकाखाली आम्ही या विषयावर कांही लेख लिहिले आहेत. ते मासिक कालचक्रामध्ये सापडल्यामुळे मध्यंतरी वर्ष दीड वर्ष बंद होते. त्यामुळे हे सर्व लेख ओळीने व एकत्रित फारच थोड्यांना वाचावयास सापडले असतील. पुढे हेही मासिक बंद झाले. 'साधुसंतांचा देवयानपंथ' या ग्रंथामध्येही आम्ही या विषयाचा थोडक्यांत उल्लेख केला आहे. अहमदनगरचे श्रीज्ञानेश्वरदर्शन मंडळाने प्रसिद्ध केलेल्या 'श्रीज्ञानेश्वरदर्शन' या महत्त्वाचे ग्रंथांत आम्ही "श्रीज्ञानेश्वर महाराजांच्या अतिमानुषत्वाचे रहस्य" या लेखांत या विषयाचे थोडे जास्त दिग्दर्शन केले आहे. असो.

हा विषय समजावून घेण्याची जिज्ञासा पुष्कळांना लागली आहे. अभ्यासाचे मार्गात अमणाऱ्या कित्येकांनी तर ह्या विषयावर स्वतंत्र ग्रंथ इंग्रजी व मराठीमध्ये लवकरच प्रसिद्ध करावा असा आग्रह बरेच दिवस धरला आहे. पण 'श्रीदत्त महाराज यांचे चरित्र' प्रसिद्ध झाल्यावाचून ह्या ग्रंथास हात घालणे शक्य नसल्यामुळे ह्या ग्रंथास उशीर होत आहे. तूर्त हा ग्रंथ मराठीत वाचकांच्या पुढे ठेवीत आहो. याचे समग्र वाचनाने आपली शास्त्रे किती परिणत अवस्थेत पोचली आहेत याची पूर्णपणे जाणीव होईल.

अध्यात्मविद्येचे जिज्ञासू व अभ्यासी असे आमचे व्यवसाय बंधू - मग ते पाश्चात्य वैद्यकशास्त्रांत पारंगत असोत अगर आयुर्वेदांत निष्णांत असोत - त्यांनी हा ग्रंथ सूक्ष्म दृष्टीने वाचावा व कांही सूचना करावयाच्या असल्यास त्या जरूर कराव्या अशी विनंति आहे. त्यांच्या योग्य सूचनांचा उपयोग पुढील आवृत्तीचे वेळी केला जाईल.

आंग्लभाषा न जाणणाऱ्यांना आणि वेदांत विषयाचा फारसा अभ्यास ज्यांनी केला नाही, अशांना या ग्रंथाचा आस्वाद घेता येईल अशा पद्धतीने हा ग्रंथ लिहिला आहे. हा शास्त्रीय विषय असल्यामुळे ग्रंथ लक्षपूर्वक वाचावा म्हणजे कोणाच्याही त्यांतील विषय सहज ध्यानी येईल.

योगशास्त्र, वेदांत व मंत्रशास्त्र; आर्य व आंग्ल वैद्यकशास्त्र, तसेच साधुसंतांचा अनुभव, या सर्वांचा विचार या ग्रंथात केला आहे असे दृष्टोत्पत्तीस येईल. षट्चक्रांचे वर्णन देतांनाच

अध्यात्मदृष्ट्या त्याचे किती व कसे महत्त्व आहे याचे दिग्दर्शन केले आहे. शेवटी चक्रभेदन करण्याचे मार्गही दिले आहेत. त्यांचे अवलंबन केल्यास साक्षात्काराचे क्रमवार अनुभव येऊ लागतील व शेवटी परब्रह्म-स्वरूपाचा साक्षात्कार करून घेतां येईल!

## ज्ञानचक्रे

या देहाचीं सर्व इंद्रिये, त्यांच्या देवता व अधिष्ठान यांसह तयार झाल्यावर जीवचैतन्यरूपी प्राण मस्तकाची टाळू फोडून आंत प्रवेश करतो व नंतर तो खाली जात सर्व शरीरांतील अणुपरमाणू व्यापून टाकतो असे ऐतरेय उपनिषदांत सांगितले आहे.

**स एतमेव सीमानं विदार्यैतया द्वारा प्रापद्यत।**
**सैषा विदृतिर्नामं। द्वास्तदेतन्नान्दनम्।।**

**- ऐतरेयोपनिषद् १-३-१२**

अर्थ - म्हणून त्या चैतन्यरूपाने या मस्तकाची सीमा विदारण करून त्या द्वाराने आंत प्रवेश केला. हे द्वार विदारण केले म्हणून ते विदृति या नांवाने प्रसिद्ध आहे. या द्वाराने जाणारा परब्रह्माचे ठिकाणी आनंद पावतो म्हणून हे द्वार नंदन होय!

मुलाची टाळू पुढे बंद होते. प्राणाची गति वरून खाली या मार्गाने झाली त्याच मार्गाने खालून प्राणशक्ति एकवटून ती पुनः वर सरळ आलेल्या मार्गाने नेण्याचे जो जाणतो त्यासच परब्रह्मस्वरूपाचा साक्षात्कार होतो. तोच अखंड आनंदाचा उपभोग घेतो! या पंथावर सहा चक्रें आहेत. ती कमलाकार आहेत. म्हणून त्यास 'कमलें' असेही म्हणतात. प्राणाची गति

खालून वर एक एक चक्रावर होत जाते. त्या चक्रांची नांवे व स्थाने खाली लिहिल्याप्रमाणे आहेत.

**१ ले मूलाधार :-** हे शिवणीचे ठिकाणी आहे.

**२ रे स्वाधिष्ठान :-** हे कटिप्रदेशाचे पुढचे भागांत आहे.

**३ रे मणिपूर :-** हे नाभीचे, बेंबीचे ठिकाणी आहे. यास नाभिकमल असेही म्हणातात.

**४ थे अनाहत :-** हे हृदयाचे ठिकाणी आहे. यास हृत्कमल असेही म्हणातात.

**५ वे विशुद्ध :-** हे कंठांत मानेचे ठिकाणी आहे.

**६ वे आज्ञा :-** हे भ्रूमध्याचे ठिकाणी दोन भुवयांचे मध्यभागी आहे. हे दोन पाकळ्यांचे आहे. म्हणून यास द्विदलकमल असेही म्हणतात.

ज्ञानचक्रांचे वर्णन करण्यापूर्वी कांही शास्त्रीय विषयाची माहिती असणे जरूर आहे म्हणून तिचा थोडक्यात उपक्रम करण्यांत येत आहे. शास्त्रीय विषय थोडा कठीण असणारच. तरीपण तो सर्वांस कळावा म्हणून त्याचे वर्णन होता होईतो सोप्या व सुलभ शब्दांत दिले आहे. वैद्यक शास्त्रांतही ह्या चक्रांना आधार कसा आहे हे कळून येण्याकरितां तुलनात्मक विवेचन करणे जरूर असल्यामुळे लक्षपूर्वक विषय वाचावा म्हणजे तो सहज ध्यानी येईल व त्यांतील रहस्य कळेल.

आपल्या शरीरांतील चलनवलनादि सर्व व्यापार कशाच्यायोगे चालतात याचा विचार केला तर भौतिकशास्त्रदृष्ट्या असे आढळून येईल की, हे सर्व व्यापार मुख्यत: मेंदूचे शक्तीवर व

ज्ञानतंतूंवर अवलंबून आहेत. याचे मुख्य स्थान मेंदू व पाठीच्या कण्याच्या पोकळींत असलेले ज्ञानतंतूंचे रज्जू हे होय. मेंदूमधून डोळे, नाक, कान आदिकरून पंच ज्ञानेंद्रिये व तसेच हात, पाय, उपस्थ आदिकरून पंच कर्मेंद्रियांस ज्ञानतंतू गेलेले आहेत. त्यायोगे पहाणे, हुंगणे, ऐकणे इत्यादि क्रिया चालतात. एवढेच नव्हे तर कामक्रोधादि मनोविकार, स्मरणशक्ति, आणीक वगैरे बुद्धीचे व्यापार, हे सर्व मेंदूचे शक्तीवर अवलंबून आहेत. मेंदूचे ठिकाणी आपले मन व इच्छाशक्ति वास्तव्य करते असे शास्त्र सांगते. पण अशी एक मजा आहे की, देहाचे सर्व व्यापार आपल्या इच्छाशक्तीवरही अवलंबून नाहीत. कित्येक ज्ञानतंतूंवर आपली इच्छाशक्ति चालते तर कित्येकांवर आपला ताबा मुळीच चालत नाही. देहाच्या चलनवलनादि क्रियांवर आपला ताबा चालतो, म्हणजे हात, पाय, तोंड वगैरे अवयव आपणास हवे तेव्हां व हवे तसे हलवितां येतात व हवे तेव्हां बंद ठेवतां येतात. उलटपक्षी हृदय, यकृत, मूत्र-पिंड, आतडी, इत्यादि अंतरिंद्रियांवर आपला ताबा मुळीच चालत नाही असे कळून येईल. त्यांचे व्यापार आपणास क्षणभरही बंद करतां येत नाहीत किंवा सुरूही करतां येत नाहीत. या दोहोंपेक्षा तिसरी एक तऱ्हा आहे. फुप्फुसासारखे कांही असे अवयव आहेत की, त्यांजवर आपल्या इच्छाशक्तीचा अर्धवट ताबा आपणास चालविता येतो. उदाहरणार्थ, आपण मनांत आणले तर श्वास आपणास काही काल दाबून धरता येतो. आपल्या इच्छाशक्तीचा ताबा चालविणारे बहुतेक ज्ञानतंतू, पाठीचे कण्यांतून जो एकत्रित

ज्ञानतंतूंचा जुडगा मेंदूचे शेवटास गेला आहे (यासच पृष्ठवंशरज्जु म्हणतात) त्यांतूनच बाहेर पडले आहेत. यासच Voulntary Nerve Fibers (व्हॉलेंटरी नर्व्ह फायबर्स) असे म्हणतात. आपला ताबा मुळीच न जुमानणारे तंतू बहुतेक मेंदूपासून निघाले आहेत व त्यांची अतिव्याप्ति आहे. त्यास Invoulantary (इनूव्हॉलेन्टरी) असे म्हणतात. अर्धवट ताबा चालविणारास Semi Involuntary Nerve Fibers (सेमी इनूव्हॉलेंटरी नर्व्ह फायबर्स) असे म्हणतात. यांचे महत्त्व फार आहे, योगशास्त्रांत प्राणायामाचे महत्त्व ही गोष्ट लक्षांत घेऊनच सांगितले आहे. प्राणाचे येणेजाणे ही क्रिया फुप्फुसावर अवलंबून आहे. तेव्हां त्यावर प्रथम ताबा मिळवितां आला म्हणजे मग सर्व इंद्रियांवर व जीवनशक्तीवर ताबा हळूहळू मिळवितां येतो! अर्धवट इच्छाशक्तीचे ताब्यांत असणारावर प्रथम संपूर्ण ताबा मिळवितां आला म्हणजे हळूहळू इच्छाशक्तीचे ताब्यांत न रहाणाऱ्यावरही ताबा मिळवितां येतो हे सहज ध्यानी येईल.

ह्या ज्ञानतंतूंचे व्यवस्थेशिवाय आपल्या शरीरामध्ये आणखी एक निराळीच व्यवस्था - System (सिस्टिम) आहे. तिला Sympathatic (सिंपथॅटिक) or Autonomus System असे म्हणतात. या अवस्थेतील ज्ञानतंतूंचे कार्य व महत्त्व याची बरोबर कल्पना अद्याप भौतिक वैद्यकशास्त्रज्ञांस समजून आलेली नाही. या व्यवस्थेतील ज्ञानतंतूंवर आपला मुळीच ताबा चालत नाही. ह्यांतील ज्ञानतंतू, हृदय, यकृत, मूत्रपिंड, फुप्फुस, जठर बस्ती, प्रजोत्पादक इंद्रिये, रक्तवाहिन्या वगैरेसारख्या अत्यंत महत्त्वाच्या

अवयवांस व भागांस गेलेले आहेत. हे जर नसते तर त्यांच्या क्रिया कमी जास्ती झाल्या असत्या अगर बंद पडल्या असत्या. ही गोष्ट शास्त्रीय प्रयोगावरूनही आतां सिद्ध झाली आहे. यांच्या योगाने सर्वांस जीवन मिळते असे म्हणण्यास हरकत नाही. इतके ह्यांचे महत्त्व आहे. ही व्यवस्था म्हणजे काही ज्ञानतंतूंच्या ग्रंथी Ganglia (गँगलिया) व त्यांची जाळी Plexuses (प्लेक्ससेस) ही होत. ह्या ज्ञानतंतूंच्या ग्रंथी व त्यांची जाळी पाठीच्या कण्याच्या पुढच्या बाजूस म्हणजे पोटाच्या आतील अंगास माकडहाडापासून तो थेट मानेपर्यंत पसरलेली आहेत. ही ठरावीक म्हणजे सहाच आहेत. ती विशिष्ट जागी व विशिष्ट अंतरावरच आहेत. त्यामध्ये ठरावीक बारीक गाठी आहेत व त्यापासून सूक्ष्म ज्ञानतंतू शरीरांतील सर्व महत्त्वाचे अवयवांस तसेच कांही मेंदूतही गेले आहेत. वैद्यकशास्त्र व योगशास्त्र यांचे दृष्टीने विचार केला म्हणजे असे दिसून येईल की, या जाळ्यांत Plexuses (प्लेक्ससेस्‌ना) षट्चक्र म्हणण्यास हरकत नाही. कारण त्यांची स्थाने, त्यांतील दलांची संख्या व वर्णन आणि त्या प्रत्येक ज्ञानचक्राचा ताबा कोठे कोठे चालतो. (Sphere of action) वगैरे वर्णन दोन्ही शास्त्रांच्या तुलनात्मक दृष्टीने तंतोतंत जुळते. यावरून भौतिकशास्त्रज्ञांना व चिकित्सक बुद्धिवाद्यांना कळून येईल की, आमचे योगशास्त्र व अध्यात्मशास्त्र हे कल्पनागम्य शास्त्र नसून ते भक्कम आधाराचे पायावर उभारलेले आहे.

* * *

Pelvic Plexus
१ मूलाधार-चक्र दलें ४
षं
सं
शं
वं
मा
या
मंगळ
वार
शिवण

## प्रकरण २ रे

## मूलाधार-चक्र - Pelvic Plexus

**यत्परं ब्रह्म सर्वात्मा विश्वस्यायतनं महत्।**
**सूक्ष्मात्सूक्ष्मतरं नित्यं सत्यमेव त्वमेव तत्॥**

**- कैवल्योपनिषद्**

**षट्चक्रं षोडशाधारं त्रिलक्ष्यं व्योमपंचकम्।**
**स्वदेहे यो न जानाति तस्य सिद्धिः कथं भवेत्॥**

**- योगचूडामण्युपनिषद्**

ज्ञानचक्रांपैकी पहिले मूलाधार चक्र होय. षट्चक्रांना मूल आधारभूत हे असल्यामुळे ह्यास आधारचक्र असे म्हटलें आहे. या मूलधारचक्रावर बाकीची चक्रे आहेत. हें सर्वांचे खाली आहे. ब्रह्मांडामधील भूपृष्ठावरील वायु प्रथम ह्या चक्रामध्ये शिरून नंतर वर चक्र-भेदन करीत जाऊन हृदयाकाशामध्ये व नंतर चित्गगनामध्ये संचार करतो; म्हणून ह्यास मूलाधार असे म्हणतात. सर्व शरीरास व प्राणास आधारभूत अशा शक्तीचे वास्तव्य या ठिकाणी आहे; अशा अनेक कारणसमुच्चयामुळे यास मूलाधार हे सार्थ नामाभिधान प्राप्त झाले आहे.

शारीरिक रचनेकडे पाहिले तर आपणास दिसून येईल की, हा हाडा-मांसाचा व रक्त-मल-मूत्र इत्यादिकांनी युक्त असा देह कुत्र्यामांजरांनी व इतर हिंस्र पशुपक्ष्यांनी लचके तोडून खाऊन टाकू नये म्हणून, ईश्वराने ह्यावर सुंदर अशा चर्मरूप वेष्टनाची

योजना केली आहे! पातळ कातड्याची एक देहाच्या आकाराची पिशवी तयार करण्यांत येऊन त्यांत सर्व अवयव योग्य ठिकाणी व्यवस्थितपणे भरण्यांत आले. नंतर पिशवीचे तोंड ज्याप्रमाणे शेवटी शिवून टाकतात त्याप्रमाणे मोठ्या चतुराईने ह्या देह-चर्माच्या पिशवीचे तोंड बाहेरून न दिसेल अशा गुह्यभागी शिवून टाकले गेले आहे! ह्या भागास शिवण असे म्हणतात. ही शिवण गुदद्वार व उपस्थ इंद्रिय यांचे मध्यावर आहे. ही शरीराचे मध्यभागी आहे. लक्षपूर्वक पाहिल्यास असे दिसून येईल की, ही शिवण कडा नीट दुमडून उत्तम प्रकारे घट्ट घातली आहे. इतकी की, ती एका रेघेप्रमाणे दिसते. शरीरांत शिवण जी म्हणतात ती ही होय. आसन घालून ताठ बसले म्हणजे ही शरीराचे मध्य रेषेवर व खालचे बिंदूवर येते. ह्या शिवणीचे ठिकाणी मूलाधार चक्र आहे असे मानतात. हटयोगामध्ये व हटयोगासंबधी जी योगचूडामणि, योगशिखा वगैरे उपनिषदे आहेत त्यांमध्येही 'गुद व मेढ म्हणजे शिस्न ह्यामध्ये मूलाधार चक्र आहे' असे वर्णन आहे. हे महत्त्वाचे चक्र असल्यामुळे ह्यावर ताबा चालवितां आला म्हणजे सर्व शक्तीचा उगम ताब्यांत येईल. म्हणून योगमार्गांतील नानाविध आसनांपैकी मूलाधार चक्रावर ताबा मिळवितां येणारे मूळ जे सिद्धासन, त्यावर योग्याने अधिष्ठित व्हावे असे सांगितले आहे. सिद्धासनाचा विचार येथे कर्तव्य नाही पण थोडक्यांत पाहिल्यास सिद्धासनाचे योगे या शिवणीवरच दाब बसतो तसे दृष्टोत्पत्तीस येईल.

## स्थान - Position

मूलाधार हे चक्र शिवणीचे ठिकाणी आहे असे सांगितले याचा अर्थ शिवणीचे कातड्याचे बाहेरचे अगर आंतील अंगास ते आहे असा न धरतां, शाखाचन्द्रन्यायाने शिवण हे उपलक्षण धरून त्याचे अनुरोधाने कटिप्रदेशांत वास्तव्य करीत असलेल्या ज्ञानचक्राचे लक्ष्य धरले पाहिजे. शुद्ध पक्षांतील द्वितीया अगर तृतीया या दिवशी चंद्राची कोर सूक्ष्म असते. ती कित्येकांना दिसत नाही. ती दाखवायची असली म्हणजे जाणता माणूस प्रथम एखाद्या झाडाच्या फांदीजवळ चंद्र येईल अशा बेताने. ज्यास चंद्रदर्शन करावयाचे आहे, अशा माणसास घेऊन उभा रहातो. प्रथम चंद्र दाखवण्यापूर्वी त्यास झाडाची शाखा दाखवितो. नंतर त्या शाखेच्या अनुरोधाने दूरवर आकाशांत पहाण्यास सांगतो. शाखेच्या अनुरोधाने दूरवर पाहिले म्हणजे पहाणारास चंद्रदर्शन होते. ह्यास शाखाचंद्रन्याय असे म्हणतात. ह्यास अनुसरून मूलाधार चक्र हे गुद व मेढ यामध्ये आहे. शिवणीचे ठिकाणी आहे, इत्यादि वर्णनांत शिवण ही शाखेचे ठिकाणी घ्यावी व तदनुरोधाने दृष्टांतांतील लक्ष्य चंद्राचे ठिकाणी कल्पिलेल्या आंतील आधारचक्रावर लक्ष्य ठेवावे. म्हणजे ह्या चक्राचे ज्ञान होईल. हा विस्तृत दृष्टांत येथे देण्याचे कारण असे की, पुढेही स्वाधिष्ठान, नाभिकमल वगैरे चक्रांचे वर्णन येईल. त्याठिकाणी 'लिंगाचे ठिकाणी अगर नाभीचे ठिकाणी ही चक्रे आहेत' असे म्हटले म्हणजे, त्या त्या बाह्यप्रदेशी ती चक्रे आहेत असा अर्थ न घेता

शाखाचन्द्रन्यायाने पोटांत कण्याचे पुढील भागी असणाऱ्या ठिकाणीच ती आहेत, असा अर्थ घ्यावयास पाहिजे. ह्या गर्भितार्थाकडे लक्ष न दिल्यामुळे म्हणा अगर हा अर्थ न कळल्यामुळे म्हणा किंवा जाणून बुजून म्हणा, कित्येक अनभिज्ञ लोक या मार्गाची हेटाळणी करितात. अगर चक्रांचे वर्णन काल्पनिक आहे, काव्यमय आहे असे मानतात. पण ही विचारसरणी भ्रमाची व चुकीची आहे. विषयावर श्रद्धा ठेवून विषयामध्ये खोल शिरून त्यांतील मर्म जाणण्याकडे बुद्धि खर्च केली म्हणजे सर्व गोष्टींचा उलगडा आपोआप होतो.

ही चक्रे काल्पनिक नसून त्यांचे प्रत्यक्ष ज्ञान होते असे पूर्वाचार्यांनी व अनुभवी सत्पुरुषांनी लिहून ठेविले आहे. हे प्रमाण सत्य आहे. हे पुढील तुलनात्मक शरीरशास्त्राचे आधाराने तसेच बुद्धिप्रामाण्यास पटेल अशा तऱ्हेने केलेल्या विवेचनावरून कळून येईल. एकाग्र आणि सूक्ष्म अशा बुद्धीच्या योगाने सूक्ष्मदृष्टि मनुष्यांना त्याचे ज्ञान होते!

**दृश्यते त्वग्र्‍यया बुद्ध्या सूक्ष्मया सूक्ष्मदर्शिभिः**

**- कठोपनिषद् १:३:१२**

शरीराचा कटिप्रदेश म्हणून जो भाग आहे त्यास कटीर असे म्हणतात. अगदी सोप्या भाषेत सांगावयाचे म्हणजे मागे माकडहाड व पुढे शिवण यांचे मध्ये असणारा ओटीपोटाचा हा भाग होय. ह्या भागास ज्यास त्रिक म्हणजे माकडहाड - Secrum (सेक्रम) - असे म्हणतात, त्याचे पुढचे बाजूस हे चक्र आहे. त्रिक असे नामाभिधान देण्याचे कारण की, हे हाड

त्रिकोणाकृति आहे. त्याचा कोन खाली आहे. म्हणजे हे वर रुंद व खाली कोनाकृति आहे. ह्या चक्रास सिंपथॅटिक नर्व्हस प्लेक्सेसपैकी Plevic Plexus (पेलव्हिक प्लेक्सस्) म्हणण्यास हरकत नाही कारण त्याच्याशी याचे वर्णन बरोबर जुळते. हे पुरुषामध्ये गुदाचे बाजूस व स्त्रियांमध्ये गुदयोनीचे बाजूस असते. यापासून कटीर प्रदेशांतील (Levic Region) सर्व अवयवांना ज्ञानतंतू गेलेले आहेत. त्यामुळे गुद्, बस्ती, धातुस्थान, योनी, गर्भाशय वगैरे सर्व अवयवांच्या क्रिया यांवर अवलंबून आहेत. ह्या चक्राची चार प्लेक्सेस आहेत. ह्या चार भागास चार दले म्हणण्यास हरकत नाही. शरीरशास्त्रदृष्ट्या त्या चतुर्दलांकित चक्राच्या वर्णनाकडे वळू.

## दले - Plexuses

(१) Inferior Hemorrhoidal (इन्फिरिअर हेमरॉइडल) :- हे मूलाधारचक्राचे मागील बाजूचे (Back Part) दल आहे. यापासून गुदाकडे (Rectum) ज्ञानतंतू गेले आहेत. गुदासंबंधी सर्व क्रिया म्हणजे मलोत्सर्ग वगैरे सर्व क्रियांवर याचा ताबा चालतो.

(२) Vesical (व्हेसिकल) :- हे पुढच्या बाजूचे दल आहे. ह्यापासून बस्तीचे (मूत्राशयाचे - Bladder) सर्व भागास, तसेच धातुस्थान (Vesuculae Seminalis and Vas Deferanes) यास ज्ञानतंतू गेलेले आहेत. तेव्हां ह्या अवयवांच्या क्रिया या दलाच्या ताब्यात आहेत असे म्हणण्यास हरकत नाही.

(३) Prostratic (प्रोस्ट्रेटिक):- हे खालचे बाजूचे (Lower Part) दल होय. मूत्राशयाचे तोंडापुढे एक मोठी ग्रंथी आहे. तिला आर्य वैद्यकांत अष्ठीला असे म्हणतात. आंग्ल वैद्यकशास्त्रात Prostrate (प्रोस्ट्रेट) असे म्हणतात. ह्या अवयवास तसेच धातुकोश व जननेंद्रियाचे उत्थापन क्रियेच्या स्नायूकडे यापासून ज्ञानतंतू जातात. म्हणजे या सर्व क्रिया या दलाचे शुद्धतेवर अवलंबून आहेत असे समजावे. यावरून विषयोपभोगाचे इंद्रियावर ताबा मिळविण्याकरितां या दलावर ताबा मिळविणे जरूर आहे असे दिसून येईल स्त्रियांमध्ये योनीकडे या दलापासून ज्ञानतंतू गेलेले आहेत. यास Vaginal Plexus असे स्वतंत्र नांव आहे.

(४) Uterine (युटराइन) :- हे वरच्या बाजूचे दल आहे. ह्यापासून स्त्रियांमध्ये गर्भाशय Uterus (युटरस) गर्भाशयाचे मुख Cervix (सरव्हिक्स) व Fallopaian Tubes (फॅलोपिअन् ट्यूब्ज्) यांजकडे व पुरुषांमध्ये धातुकोशाकडे ज्ञानतंतू गेलेले आहेत.

उपरिनिर्दिष्ट मूलाधार चक्राचे शरीरशास्त्रदृष्टचा वर्णन शरीरशास्त्रावरील पुस्तकांमध्ये (Anatomy) सविस्तर पाहावयास सापडेल. पेलव्हिक प्लेक्सचे चार भाग कल्पिलेले आहेत. तीच दले होत. आतां योगशास्त्रदृष्ट्या ह्या मूलाधार चक्राचे वर्णन खाली करीत आहो, ते लक्षपूर्वक वाचल्यास वरील वर्णनाशी किती जुळते हे सहज ध्यानी येईल. ह्याशिवाय वेदांत, मंत्रशास्त्र व अनुभव या दृष्टीनेही पुढचे विवेचन लक्षांत घ्यावे; अस्तु.

योगशिखोपनिषदामध्ये मूलाधार चक्राचे वर्णन आहे ते असेः-

**गुदमेढ्रान्तरालस्थं मूलाधारं त्रिकोणकम्।**
**शिवस्य जीवरूपस्य स्थानं तद्धि प्रचक्षते।**
**यत्र कुण्डलिनी नाम परा शक्तिः प्रतिष्ठिता।।**
**यस्मादुत्पद्यते वायुर्यस्माद्वन्हिः प्रवर्तते।**
**यस्मादुत्पद्यते बिन्दुर्यस्मान्नादः प्रवर्तते।**
**यस्मादुत्पद्यते हंसो यस्मादुत्पद्यते मनः।**
**तदेतत्कामपाख्यं पीठं कामफलप्रदम्।।**

**- योगशिखोपनिषद् १-१६८:१७१**

मूलाधार हे पहिले चक्र आहे. "आधारं प्रथमं चक्रं." यास चतुर्दले आहेत. "चतुर्दलं स्यात् आधारं" असे आधार नांवाचे चक्र गुदस्थानी आहे. "आधाराख्ये गुदस्थाने पङ्कजं यत् चतुर्दलम्" वगैरे स्पष्ट वर्णन योगचूडामणि व ध्यानबिंदु या उपनिषदांत केलेले आहे. या चार दलांमध्ये व, श, ष, स, हे चार वर्ण आहेत. ही अक्षरेसुद्धा ओळीने बसतात. ह्यास बीजे मानिली आहेत. ही फार भारी बीजे आहेत. कारण ही अगदी मूलाधार चक्राचे ठिकाणी आहेत. बीज म्हणावयाचे म्हणजे वरील वर्ण वं, शं, षं, सं, असे उच्चारिले पाहिजेत. यांत वं हे बीज खालचे बाजूचे पाकळीवर स्थित आहे. हे फार भारी बीज मानले आहे. ह्या एका बीजानेच सर्व मंत्र सिद्धीस पावतात! एवढी याची थोरवी असण्याचे कारण ह्या दलाचे वर्णनाकडे लक्ष दिल्यास सहज ध्यानी येईल. या दलापासून विषयोपभोगास चेतना मिळते. या दलावर ताबा मिळविला

म्हणजे विषयवासना जिंकता येते. विषयवासना जिंकल्यावर मग जगांत काय जिंकावयाचे राहिले? ती जिंकणारास सर्व काही प्राप्त होते. वं बीजाचे केवढे हे महत्त्व! शं हे बीज डावे बाजूचे पाकळीमध्ये, षं हे वरचे बाजूचे पाकळीत व सं हे पुढचे पाकळीत स्थित आहे. ह्या प्रत्येक दलांत एक एक शक्ति वास्तव्य करिते. गुप्ता, प्रासका, कराळा व विकराळा अशा त्या अनुक्रमे होत. ह्या प्रत्येक शक्तीपासून निरनिराळ्या आनंदाची प्राप्ति होते. परमानंद, सहजानंद, वीरानंद, योगानंद असे अनुक्रमाने आनंद त्या त्या शक्त्यानुरूप आहेत. पहिली गुप्ता ही शरीरांतील गुद व योनी यासारख्या गुप्त इंद्रियांना जीवन देते म्हणून तीस गुप्ता असे म्हणतात. ह्या गुप्त शक्ति कह्यांत आल्या म्हणजे त्यापासून परमानंद सुखाची प्राप्ति होते. याचप्रमाणे सर्व शक्तींचे समजावे. या मूलाधार चक्राचे ठिकाणी अपान वायूचे भ्रमण आहे. ज्याप्रमाणे कोणत्याही कार्यांत विघ्नहरण व्हावे म्हणून प्रथमारंभी श्रीगजाननाचे स्मरण करतात, त्याप्रमाणे या आधार चक्राचे ठिकाणी गजानन देवतेचे अधिष्ठान आहे असे मानल्यास ते योग्य नव्हे काय? उलट असे म्हणतां येईल की, प्राण्यांच्या व शक्तीच्या उगमस्थानी गजानन देवता कल्पिल्यामुळे त्याच देवतेस सर्व व्यवहारामध्ये प्रथमारंभी नमन करण्याची वहिवाट आहे! या चक्राचे ठिकाणी ध्यान केले असतां व श्रीगजाननाचे स्मरण केले असता मंगल प्राप्त होते म्हणून याठिकाणी सप्त वारांपैकी मंगळवाराची कल्पना केली आहे. मोक्षदायक सप्तपुरींपैकी माया नांवाच्या पुरीचे हे स्थान

आहे. आत्मसाक्षात्काराचे मार्गांच्या अनुभवाचे पहिले दृश्य जो आरक्त वर्ण, तो या चक्रावर धारणा धरल्यास दिसू लागतो! आधारचक्राचे महत्त्व पुष्कळ वर्णिले आहे व ते फार बहारीचे आहे. याठिकाणी विश्वाची उत्पत्ति व लय होतो. विद्युत्पुंजाप्रमाणे प्रकाश येथे दिसतात! आधार हे घराचे कवाडाप्रमाणे (लहान दाराप्रमाणे) आहे. हे एकदा उघडले म्हणजे स्वगृहांत प्रवेश होतो! आधारशक्तीचे ज्ञान झाले म्हणजे त्रैलोक्याचे ज्ञान होते. सर्व पापापासून तो मुक्त होतो व ब्रह्मस्वरूपाप्रत प्राप्त होतो!

या आधारचक्रावर ताबा मिळविणे किती महत्त्वाचे व जरुरीचे आहे हे कळून येईल. तो कसा मिळवायचा हा मोठा अवघड प्रश्न आहे. श्रद्धा ठेवून नियमितपणाने मनोलय व प्राणलयाचा अभ्यास केल्यास त्या प्रश्नाचा उलगडा होईल. सहस्रदलकमलापासून हे मूल आधारकमल शेवटचे व दूरचे आहे. तसेच सिंपथॅटिक सिस्टिमपैकी अत्यंत महत्त्वाचा भाग जे नाभिकमल की, ज्यास Abdominal Brain पोटांतील मेंदू असे म्हणतात, त्यापासूनही हे कमल दूर आहे. ह्यास गेलेले ज्ञानतंतू शेवटचे आहेत. ह्या अग्रभागी असलेल्या ज्ञानतंतूंवर ताबा मिळविता आला म्हणजे क्रमाने हळूहळू वर वर असलेल्या चक्रांवर ताबा मिळवितां येतो व प्राण योग्य मार्गाने जाऊन शेवट गाठता येतो ह्यास एक दृष्टांत देऊन हे प्रकरण पुरे करू.

एका मोठ्या राजाच्या पदरी एक कारभारी होता. कांही कारणाने राजाची त्याच्यावर इतराजी झाली तेव्हा राजाने त्यास एका उंच

मनोऱ्यावर अगदी वरच्या कोठडीत कैद करून ठेवले. ही गोष्ट त्याच्या पत्नीस कळतांच ती त्या मनोऱ्याकडे धावत आली व खाली उभे राहून तिने पतीला हाक मारिली. वरील खिडकींतून तोंड बाहेर काढून कारभारी म्हणाला, "रात्री तू इकडे ये, आणि येताना एक जाड दोरखंड, तितकीच बारीक सुतळी, थोडा रेशमी दोरा, थोडा शिवावयाचा दोरा व एक नाकतोडा प्राणी आणि थोडासा मध बरोबर घेऊन ये." पतीने सांगितलेले सर्व जिन्नस बरोबर घेऊन ती रात्री तिथे आली. तेव्हा तो कारभारी तिला म्हणाला, "रेशमी दोऱ्याने नाकतोड्याचे शेपूट बांध. त्याच्या मिशांस थोडासा मध लावून त्यास या खिडकीकडे तोंड करून सोड." तिने याप्रमाणे करतांच मधाचे वासाने लोभावलेला तो प्राणी वर वर जाऊं लागला. आपण आणखी थोडे वर गेलो म्हणजे मध खावयास मिळेल असे त्यास वाटत होते. वर जातां जातां तो खिडकीपाशी गेला. त्याबरोबर त्या कारभाऱ्याने त्यास पकडून त्याच्या शेपटीचा रेशमी दोरा हस्तगत करून घेतला. नंतर त्या रेशमी दोऱ्याच्या खालच्या टोकास शिवावयाचा दोरा बांधावयास त्याने आपल्या पत्नीस सांगित्ले व रेशमी दोरा व त्याच्या साहाय्याने जाड सुतळी व तिच्या साहाय्याने ते जाड दोरखंड त्याने वर ओढले. दोरखंड वर आल्याबरोबर त्याचे एक टोक खिडकीच्या एक गजास बांधून तो त्या दोरावरून खाली आला व अशा रीतीने मोठ्या युक्तीने त्याने आपली सुटका करून घेतली.

* * *

Aorlic Plexus
२ स्वाधिष्ठान-चक्र दलें ६
लं
बं
भं
रं
यं
मं
कांची
बुधवार
लिंगस्थान

## प्रकरण ३ रे

## स्वाधिष्ठान चक्र - Arotic Plexus

**स्वशब्देन भवेत्प्राणः स्वाधिष्ठानं तदाश्रयम्।**
**स्वाधिष्ठानं ततश्चक्रं मेढमेव निगद्यते॥**

**- ध्यानबिंदु ४८**

ज्ञानचक्रांपैकी दुसरे स्वाधिष्ठान चक्र होय. ह्या चक्रास सिंपथॅटिक नर्व्हस प्लेक्सेसपैकी Aortic Plexus (एओर्टिक प्लेक्सस) म्हणण्यास हरकत नाही.

### स्थान - Position

स्वाधिष्ठान चक्र हे उपस्थेंद्रियाच्या पातळीत पाठीतील कण्याचे पुढच्या भागावर आहे. पाठीतील कण्यापैकी ज्यास Lumber Region (लंबर रिजन) म्हणतात त्याच्या शेवटच्या दोन तीन मणक्यांचे पुढे हे चक्र आहे. प्रथम शारीरिक शास्त्राच्या दृष्टीने याचे वर्णन काय आहे ते पाहूं. हृदयापासून जी मोठी शुद्ध रक्तवाहिनी निघाली आहे ती कण्याच्या पुढूनच कटीरदेशापर्यंत जाते. हीस एओर्टा म्हणतात. या मोठ्या रक्तवाहिनीच्या पोटांतील जो भाग आहे त्यास Abdominal Aorta (ॲब्डॉमिनल एओर्टा) असे म्हणतात. या भागाचे पुढच्या अंगास ज्ञानतंतूंची जाळी आहेत. म्हणून ह्या चक्रास एओर्टिक प्लेक्सस असे म्हणतात. या चक्रापासून मोठ्या आंतड्याच्या पुष्कळशा भागास, गुदास व अंडकोशाकडे

ज्ञानतंतू गेलेले आहेत. ह्या सर्व अवयवांच्या क्रियेवर या चक्राचा ताबा चालतो, या चक्राचे सहा भाग आहेत. तीच याची दले होत. ती अशी :-

## दले - Plexuses

(१) Spermatic (स्पेरमॅटिक):- या दलाच्या कांही भागापासून अंडद्वयाकडे ज्ञानतंतू गेलेले आहेत. अंडकोशातील वीर्योत्पादनावर याचा ताबा चालतो.

(२) Left Colic (लेफ्ट कॉलिक):- मोठ्या आंतड्याचा प्लीहेपासून जो उतरता भाग आहे त्याकडे यांतील ज्ञानतंतू गेले आहेत. त्या भागावर याचा ताबा चालतो.

(३) Segmoid (सेग्मॉइड):- मोठे आंतडे कटीराचे डाव्या भागांत आल्यावर त्याचा आकार लहान होतो. याठिकाणी पृष्ठभागास ते चिकटलेले आहे. ह्या आंतड्याचे भागास सेग्मॉइड असे म्हणतात. ह्या भागास या दलापासून ज्ञानतंतू येतात. अन्नरसाचे पचन झाल्यावर त्यांतील टाकाऊ भाग मलरूपाने जेव्हां मोठ्या आंतड्याच्या या सेग्मॉइड भागापर्यंत येतो त्यावेळी या चक्रापासून निघणाऱ्या ज्ञानतंतूंच्या प्रेरणेने आपणांस मलोत्सर्गाची संवेदना उत्पन्न होते. त्यावरून या चक्रावर ताबा मिळविता आला म्हणजे ठरावीक वेळी व इच्छेप्रमाणे मलोत्सर्ग करणे ही आपल्या हातची गोष्ट रहाते.

(४) Superior Haemorrhoidal (सुपीरिअर हेमरॉइडल) :- मोठ्या आतड्याचा शेवटला भाग ज्यास गुद

(Rectum) असे म्हणतात, त्याचे वरचे भागाकडे या दलापासून ज्ञानतंतू गेलेले आहेत. तेव्हा अर्थात् ह्या भागावर या चक्राचा ताबा चालणे स्वाभाविक आहे. मूळव्याध, भगंदर वगैरेसारखे रोग होऊ न देणे किंवा झाले असतां बरे करणे ह्या गोष्टी या चक्रावर ताबा मिळवितां आला म्हणजे सहज शक्य आहेत.

(५) Inferior Messenteric (इन्फिरिअर मेसेंटेरिक) :- एओर्टाच्या - मोठ्या रक्तवाहिनीच्या - शेवटच्या भागापासून मोठ्या आतड्याकडे जाणारी एक रक्तवाहिनी निघते. तिच्याभोवती हे चक्र आहे. मोठ्या आतड्याकडे रुधिराभिसरणाचा प्रवाह कमी अधिक करणे ही गोष्ट या दलावर ताबा मिळाल्याने साध्य होणारी आहे हे सहज लक्षांत येईल.

(६) Hypo Gastric (हायपोगॅस्ट्रिक) :- कटीर प्रदेशांतील अवयवांना या चक्रापासून ज्ञानतंतू गेलेले आहेत. तेव्हा त्या दलावर ताबा मिळविला म्हणजे कटीर प्रदेशांतील (ओटीपोटांतील) अवयवांच्या क्रिया आपल्या स्वाधीन ठेवता येतील.

स्वाधिष्ठान चक्राचे शरीरशास्त्रदृष्ट्या विवेचन केल्यावर आतां वेदांत व योगशास्त्रदृष्ट्या विवेचन खाली करीत आहो. एओर्टिक प्लेक्ससचे ६ भाग कल्पिले आहेत. तशी स्वाधिष्ठान चक्राची ६ दले कल्पिली आहेत. पुढील विवेचन तुलनात्मक दृष्टीनें वाचावे.

**स्वाधिष्ठानाव्हयं चक्रं लिंगमूले षडश्रके।**

**- योगशिखा १:७२**

**स्वाधिष्ठानं षड्दलम्।**

**- योगचूडामणि ४**

स्वाधिष्ठान नांवाचे चक्र उपस्थ इंद्रियाचे ठिकाणी वसत आहे. यास ६ दले आहेत. अपानवायु याचे आश्रयाने आहे. वगैरे वर्णन योगशिखा, योगचूडामणि, ध्यानबिंदु वगैरे उपनिषदांत आहे हे उपरिनिर्दिष्ट औपनिषद्वाक्यावरून दिसून येईल. या षड्दलांकित चक्रामध्ये ब, भ, म, य, र, ल, हे सहा वर्ण आहेत. ही सहा बीजे ह्या कमलाच्या एक एक पाकळीत आहेत. या प्रत्येक दलांत एक एक शक्ति वास्तव्य करते. १ अव्यंगता, २ शारदा ३ वाणी ४ अमृता ५ पूर्णा ६ रोहिणी या शक्ति होत. ह्या प्रत्येक शक्तीपासून निरनिराळ्या स्वरूपाच्या आनंदाची प्राप्ति होते. त्यांची नांवे सप्तचक्रविवरण कोष्टक दिले आहे त्यांत पहावी. या चक्राची देवता ब्रह्मा ही मानली आहे. विघ्नहर्ता श्रीगजाननाचे ध्यान अगर स्मरण केल्यानंतर ब्रह्मदेव हा सृष्टि उत्पन्न करणारा असल्यामुळे या लिंगस्थानाचे ठिकाणी असलेल्या स्वाधिष्ठान चक्राचे ठिकाणी त्याचे अधिष्ठान मानणे योग्य आहे. या ठिकाणी सप्तवारांपैकी बुधवारची कल्पना केली आहे. मोक्षदायक अशा सप्तपुरींपैकी कांची नामक नगरी येथे आहे असे मानले आहे. साक्षात्काराचे मार्गांतील प्रकाशाचे अनुभवापैकी पीतवर्ण हा, या चक्राचे ठिकाणी ध्यान धरल्यावर दृग्गोचर होतो! पृथ्वीतत्त्व, स्थूलदेह व जागृत अवस्था ही सर्व येथे मानली आहेत. अपानवायूचे वास्तव्य येथे आहे. उपवायूंपैकी धनंजय नामक वायु येथे भ्रमण करतो. हा

शब्दउत्पत्ति करतो. मृत्यूनंतर कांही काल हा असतो असे घेरंडसंहितेत सांगितले आहे.

**भवेद्धनंजयाच्छब्दः।**

**न जहाति मृतं वाऽपि। -घेरंडसंहिता ५-६४-६५**

मागे शरीरशास्त्राप्रमाणे वर्णन केले आहे, ते वर्णन व येथील वर्णन पाहिले म्हणजे साम्य दिसून येईल. अपानवायूचे जडरूप म्हणजे पोटांतील आंतड्यात जो वायु धरतो (गॅसेस धरतात) असे आपण मानितो ते होय. हे गॅसेस पचनक्रिया बरोबर न झाल्यामुळे धरतात. पचनक्रिया ही आंतड्यातील रसोत्पादक पिंडावर बरीचशी अवलंबून आहे. या रसोत्पादक पिंडास व आंतड्याचे आकुंचन व प्रसरणात्मक क्रियेस चालना देणारे सिंपथॅटिक नर्व्ह फायबर्स आहेत. ते या चक्रापासून निघतात. अपानवायूच्या शक्त्यात्मक रूपाचे भ्रमण या ठिकाणी असल्यामुळे मोठ्या आंतड्याच्या बहुतेक भागांवर ताबा मिळवितां येतो. आंतडी मलविसर्जन करून साफ राखणे, वेळोवेळी व इच्छेनुरूप शौच करणे व गुदावर ताबा मिळविणे इत्यादि क्रिया साध्य होतात. तसेच अपानवायूवर ताबा मिळविला म्हणजे तो ऊर्ध्वगत करून वर चढवितां येतो व पुढील मणिपूर चक्रावर प्राण व अपान यांचे ऐक्य स्थापन करतां येते!

पाश्चात्त्य लोकांपैकी वेदांती म्हणविणारे कित्येक लोक स्वाधिष्ठान चक्राऐवजी Spleen or Splenic Chakra (स्प्लीन किंवा स्प्लेनिक चक्र) प्लीहाचक्र मानतात. त्यांच्या

मताप्रमाणेच हे चक्र प्लीहेच्या ठिकाणी आहे. आपल्या वेदांतशास्त्र, योगशास्त्र, व मंत्रशास्त्र या दृष्टीने विचार केला म्हणजे ही कल्पना चुकीची आहे असे दिसून येईल. मनोलयाचा किंवा प्राणलयाचा अभ्यास करतांना जेव्हां चित्ताची एकाग्रता होऊं लागते तेव्हां प्राणाची गति एका रेषेत ऊर्ध्व होऊ लागते, असा अनुभव येईल. प्राण मूलाधार चक्रावरून सरळ वर स्वाधिष्ठान चक्रावर जातो, नंतर नाभिकमलावर जातो. तेथे तो सुषुम्नापंथाने वर सरळ चक्रभेदन करीत जातो. यावरून असे दिसून येते की, प्राण सरळ रेषेत वर जातो. पांथरीचे ठिकाणी चक्राची कल्पना केल्यास प्राणाची गति वांकडी होऊन वर जाते व पुन्हां खाली नाभिकमलावर येते असे कल्पावे लागेल. कारण प्लीहा-पांथरी ही पोटांत बेंबीचे डाव्या भागांत वरचे बाजूस आहे. तेव्हा प्लीहाचक्राची कल्पना पचनी पडणार नाही. त्यांच्या मताप्रमाणे "हे चक्र, या स्थूल देहाहून भिन्न असलेला, जडरूपांत पण चर्मचक्षूस अदृश्य असा, जो दुसरा देह आहे त्याचे बाह्य भागावर आहे. बाह्यशक्ति काटकोनांत वाहते. अंतरशक्ति वाटोळी फिरते व लाटाकार होते म्हणून रंगाच्या लहरी दिसतात त्यास दले म्हणातात. ज्याला गुरुकृपेने अतींद्रियज्ञान प्राप्त झाले त्यासच ही चक्रे प्रकाशरूपांत दिसतात" वगैरे त्यांची मते आहेत. ही मते आपल्या वेदांतादि शास्त्रांत कितपत पटतील याचा सूज्ञांनी विचार करावा. ते स्वाधिष्ठान चक्र मानीत नाहीत. यास कारणे अशी देतात की, या चक्राचे उत्थापन (Arousing) झाले की

भयंकर संकट उत्पन्न होईल! व ही एक दुर्दैवाची गोष्ट आहे. चक्राचे ज्ञान झाल्यानंतर ते प्रकाशरूपांत दिसते असे मानल्यावर ते चक्र ज्या स्थानी आहे त्या अवयवांस काय महत्त्व राहते ते सांगणे कठीण आहे. चक्राचे उत्थापन म्हणजे ज्ञान. ते अतींद्रिय आहे. उत्थापन म्हणजे चक्राच्या स्थानाचे उत्थापन नव्हे. तेव्हां पाश्चात्यांची मते वाचून एवढी भीती बाळगणे भ्रामकपणाचे होईल. असो. सर्व शास्त्रांच्या दृष्टीने विचार करतां स्वाधिष्ठान चक्रच मानणे बरोबर होईल व ते खरे आहे. वाचकांनी याचा अनुभव घेऊन पहावा.

Solar Plexus
३ मणिपूर-चक्र दलें १०
फं
डं
ढं
णं
तं
पं
थं
नं
धं
दं
अवंती
गुरुवार
नाभी

## प्रकरण ४ थे

# मणिपूर ऊर्फ नाभिकमल

## Solar Plexus or Abdominal Brain

**नाभिदेशे स्थितं चक्र दशास्त्रं मणिपूरकम् ॥**

**- योगशिखा ५-९**

ज्ञानचक्रांपैकी तिसरे ज्ञानचक्र महत्त्वाचे आहे. या तिसऱ्या चक्राला मणिपूर ऊर्फ नाभिकमल असे म्हणतात. या चक्रास सिंपथॅटिक नर्व्हस सिस्टिमपैकी Solar Plexus (सोलर प्लेक्सस) म्हणण्यास हरकत नाही. याचे फार महत्त्व आहे. आपल्या मेंदूमध्ये (Brain) ज्याप्रमाणे पांढरी व निळी वस्तु (White and Gray Matter) आहे व तिची निरनिराळी कार्ये आहेत, त्याप्रमाणे या चक्राचे ठिकाणी या दोन्ही वस्तु आहेत. म्हणून त्यास पोटांतील मेंदू (Abdominal Brain) असे नांव देण्यात आले आहे! आपल्या डोक्यांतील मेंदूचे किती महत्त्व आहे हे निराळे सांगण्याचे कारण नाही. त्यावर शरीरांतील सर्व क्रिया अवलंबून आहेत. तद्वतच या चक्रास मेंदू असे नामाभिधान दिले आहे. यावरून याचेही किती महत्त्व आहे व यावर शरीरांतील सर्व क्रिया कशा अवलंबून आहेत हे दिसून येईल. हे सूर्यासारखे तेजस्वी आहे! सूर्य उदय पावला म्हणजे पृथ्वीवर सर्वत्र प्रकाश पडतो त्याप्रमाणे येथे वसत असलेल्या कुंडलिनी शक्तीचा उदय झाला म्हणजे आत्मरवीचा प्रकाश

सर्वत्र पडतो. म्हणून यास सूर्यासारखे तेजस्वी (Solar) असे सूर्यवाचक नांव दिलेले असावे!

हे चक्र सर्वात मोठे आहे. कण्याच्या दोन्ही बाजू, गँग्लिया, सीलिॲक गँग्लिया व ज्ञानतंतूंची अगदी दाट जाळी यांचे हे चक्र बनले आहे. आमाशयाकडे व आंतड्याकडे जाणाऱ्या रक्तवाहिनी (Caeliac Artery) चे उगमाभोवती यांची जाळी आहेत. आमाशयाचे मागे व Diphram (डायाफ्रॅम) - छाती व पोट यामधील पडदा व महास्रोतस (ॲब्डॉमिनल एओर्टा) यांचे पुढे हे पसरलेले आहे. यापासून पुष्कळ रक्तवाहिन्यांना ज्ञानतंतू गेले आहेत.

## स्थान - Position

नाभी म्हणजे बेंबी. ह्याठिकाणी हे चक्र आहे असे मानतात. शाखाचंद्रन्यायाने याचा लाक्षणिक अर्थ घ्यावयाचा हे मागे सांगितले आहे. तदनुरूप नाभीचे ठिकाणी म्हणजे नाभीचे समांतर पातळीत आपल्या कण्याचे पुढचे बाजूस ह्या चक्राचे स्थान आहे असे समजावे. कण्याचा जो पाठीतील भाग Lumbar Region (लंबर रिजन) यांतील पहिल्या मणक्याचे पुढील अंगास हे चक आहे. या चक्राचे अत्यंत महत्त्व आहे. कारण पोटांतील सर्व अवयवांवर याचा ताबा चालतो. याठिकाणी कुंडलिनी शक्तीचे वास्तव्यस्थान आहे. प्राण व अपान यांचे ऐक्य करण्याचे व मध्यमार्ग स्वीकारण्याचे हे स्थान होय! शारीरिक वैद्यकशास्त्रदृष्टया याचे काय वर्णन आहे ते

पाहूं. ते कळले म्हणजे आमच्या योगशास्त्राशी ते तंतोतंत कसे जमते ते लक्षांत येईल. याची दहा दले (Plexuses) आहेत. ती अशी -

## दले - plexuses

(१) Phrenic (फ्रेनिक):- या दलामधून डायाफ्रॅम पडदा व वृक्काकडे (सुप्रारीनल ग्लँड्स) ज्ञानतंतू जातात. डायाफ्रॅम ह्या पडद्याचे श्वासोच्छ्वासाचे क्रियेत अत्यंत महत्त्व आहे. तेव्हा यावर ताबा मिळविता येतो.

(२) Hepatic (हिपॅटिक):- हे सर्वांत मोठे दल आहे. येथून सर्व क्रिया चालतात. यकृताच्या आंत-बाहेर जाणाऱ्या व यकृतात फिरणाऱ्या सर्व रक्तवाहिन्यांवर याचा ताबा आहे. आमाशयाकडे (स्टमक) जाणाऱ्या रक्तवाहिन्यांसही येथून ज्ञानतंतू मिळतात.

(३) Splenic (स्प्लेनिक):- प्लीहा व याच्या रक्तवाहिन्या यांचे कियेवर या दलाचा ताबा आहे.

(४) Superior Gastric (सुपीरिअर गॅस्ट्रिक):- आमाशयाच्या वरच्या बाकदार लहान भागाकडे याचे ज्ञानतंतू गेलेले आहेत.

(५) Supra-Renal (सुप्रारीनल):- वृक्कावर या दलाचा ताबा आहे. या अवयवाचे मानाने याकडे जाणारे ज्ञानतंतू मोठे आहेत. हल्ली या अवयवाचे महत्त्व किती आहे हे सर्वसाधारण सुशिक्षितास ठाऊक आहे. शरीराच्या साधारण पोषणाचे क्रियेत

या अवयवाचा फार मोठा भाग आहे असे आतां ठरले आहे. तेव्हा साहजिकच याकडे मोठे ज्ञानतंतू जातात.

(६) Renal (रीनल):- मूत्रपिंडाकडे यांतून ज्ञानतंतू गेले आहेत. मूत्रपिंडाच्या सर्व क्रिया या दलावर अवलंबून आहेत. येथून काही तंतू अंडकोशाकडे जाणाऱ्या शिरेकडे व मूत्रवाहिनीकडे गेले आहेत.

(७) Spermatic (स्पेरमॅटिक):- पुरुषांत अंडकोशाकडे जाणाऱ्या शिरेकडे या दलांतून ज्ञानतंतू जातात. बायकांत ओव्हरी (गर्भपिंड) व गर्भाशयाचा मोठा भाग याकडे ज्ञानतंतू जातात. त्यामुळे त्यास Ovarian Plexus (ओव्हेरिअन प्लेक्सस) असे नांव मिळते. जीवोत्पादक अवयवावर या दलाचा ताबा चालतो हे दिसून येईल. या आणि वरील सहाव्या दलाचा फार निकट संबंध आहे. या दोन्ही पाकळ्या चिकटल्या आहेत असे आपण मानू. याचे प्रत्यंतर म्हणजे मूत्रपिंडांत जेव्हा अश्मरी होतो तेव्हां कंबरेत व पोटांत तीव्र वेदना होतात तशा अंडामध्येही वेदना होऊं लागतात. वैद्य लोकांचे पाहण्यांत हे लक्षण असेलच.

(८) Superior Mesenteric (सुपीरिअर मेसेंटेरिक):- अंत्रावरण व लहान आंतड्याचे सर्व भाग या सर्वांच्या क्रिया या दलावर अवलंबून आहेत.

(९) Pancreatic (पँक्रिएटिक):- पँक्रिआज यास जठर म्हणण्यास हरकत नाही. कारण हा अन्नरस पचविण्याचे कामी फार उपयोगी आहे. या अवयवास या दलांतून ज्ञानतंतू जातात.

(१०) Colic (कॉलिक):- लहान आंतड्याचे भाग, लहान व मोठे आंतडे यांचा संधि-भाग, मोठ्या आंतड्याचा पहिला व दुसरा भाग, एकूण लहान व मोठ्या आंतड्याच्या बऱ्याच भागाकडे यांतून ज्ञानतंतू जातात.

वरील वर्णन वाचल्यावर सहज ध्यानी येईल की, अन्नाचे पचन, शोषण, रसोत्पादन, मलविसर्जन यासंबंधी; मूत्राशयासंबंधी सर्व क्रिया; तसेच प्रजोत्पत्ति आणि कांहीशा श्वासोच्छ्वास व रुधिराभिसरण या अत्यंत महत्त्वाच्या क्रिया या चक्रावर अवलंबून आहेत. या चक्रांतून वरती अनाहत चक्राकडे काही ज्ञानतंतू गेले आहेत व खाली स्वाधिष्ठानाकडे काही गेले आहेत. या चक्राचे शरीरशास्त्राप्रमाणे चित्र काढले तर ते कमलाचे आकृतीप्रमाणे बरोबर येते! मग आमचे योगशास्त्रांत या ज्ञानचक्रांना कमलाची उपमा दिलेली आहे ती कल्पनारम्य व काव्यमय का वाटावी?

दोन्ही शास्त्रांप्रमाणे त्यांची स्थाने जमतात. दलांची संख्या व दलांचे वर्णन जमते. एवढेच नव्हे तर प्रत्यक्ष ठेवणीची आकृतीही जमते. तेव्हां ज्ञानचक्रे ही Sympathatic Plexuses (सिंपथॅटिक प्लेक्सेस) आहेत हे निश्चित समजण्यास हरकत नाही.

आपल्या शास्त्रानुसार याचे वर्णन कसे आहे ते पहा. मणिपूर ऊर्फ नाभिकमल हे तिसरे चक्र आहे. यास दहा पाकळ्या - दले - आहेत. त्या प्रत्येक पाकळीत अनुक्रमे ड, ढ, ण, त, थ, द, ध, न, प, व फ असे दहा वर्ण आहेत. ह्यांस मातृका

किंवा बीजे म्हणतात. पंचप्राणांपैकी समान वायूचे हे राहण्याचे ठिकाण आहे. उपवायूंपैकी कृकल या नांवाचा वायु येथे वास्तव्य करतो. कृकल (कृकर) वायु हा क्षुधा व तृषा उत्पन्न करतो. शिंक येणे हे त्याचे कार्य आहे. येथे परा ही श्रेष्ठ वाणी आहे. ही स्फुरणरूप आहे. तिन्ही वाचांचा लय या वाचेत व्हावयास पाहिजे. म्हणजेच हिचे ज्ञान होते. विष्णु या देवतेचे येथे अधिष्ठान आहे. मूलाधार चक्रावर श्रीगजाननाचे स्मरण केल्यावर व स्वाधिष्ठानावर सृष्टिकर्त्या ब्रह्मदेवाचे दर्शन घेऊन आल्यावर साहजिकच या स्थानी जगताचे पालन करणाऱ्या श्रीविष्णूचे दर्शन होते! विष्णु शरीरांतील, यकृत, पांथरी, आमाशय, पक्काशय, वृक्क वगैरे महत्त्वाचे अवयबांचे रक्षण करून देहाचे पोषण करितो. सप्तपुरींतील अवंती ही नगरी येथे मानली आहे.

गुरुकृपेने येथे वसत असलेली कुंडलिनी उत्थापन होत असल्यामुळे सप्तवारांपैकी गुरुवारची येथे योजना केली आहे. या कमलाचा नीलवर्ण आहे. प्रत्येक पाकळीचे ठिकाणी एक एक शक्ति आहे व त्या ठिकाणी एक एक आनंदाची प्राप्ति होते. त्या आनंदांची नावे कोष्टकात दिली आहेत. या ठिकाणी गेल्यावर विष्णूचे सान्निध्यांत समीपता ही मुक्ति मिळते.

* * *

Cardiac Plexus
४ अनाहत-चक्र दलें १२
ञं
कं
खं
झं
गं
टं
ठं
घं
जं
छं
चं
ङं
मधु
शुक्र
रा
वार
हृदय

## प्रकरण ५ वे

## अनाहत चक्र ऊर्फ हृत्कमल - Cardiac Plexus

**द्वादशारं महाचक्रं हृदये चाप्यनाहतम्।**

**- योगशिखा ५-९**

सप्त ज्ञानचक्रांपैकी अनाहत हे चवथे चक्र आहे. ह्यास हृत्कमल म्हणतात. हे हृदयाचे ठिकाणी छातीत आहे. म्हणून यास हृत्कमल असे नामाभिधान प्राप्त झाले आहे. ज्यास इंग्रजींत हार्ट म्हणजे हृदय म्हणतात त्याचे मागे हे चक्र आहे. म्हणून शरीरशास्त्रांतही त्यास सिंपथॅटिक प्लेक्ससपैकी Cardiac Plexus (कार्डिॲक प्लेक्सस) असे यथायोग्य नांव दिले गेले आहे. छातीच्या फासळ्यांचे पिंजऱ्यांत सुरक्षित ठेवलेल्या फुप्फुस व हृदय यासारख्या अत्यंत महत्त्वाच्या शरीरांतील अवयवांवर याचा ताबा चालतो. शरीराचे जीवन अशा हृदयासच या चक्राने व्यापले आहे असे दिसेल! तेव्हा याचे महत्त्व किती आहे हे लक्षांत घ्यावे. ह्यावर ताबा मिळविला म्हणजे प्राणावरच ताबा मिळविल्यासारखे होईल. ह्या चक्रास अनाहत असे नांव मिळण्याचे कारण आहे. ह्या चक्राचे ठिकाणी मनाचे वास्तव्य मानिले आहे. येथे प्राण आला की, मन व प्राण यांचे ऐक्य होते. चित्ताचे एकाग्रतेमुळे प्राण व मन यांचा लय होऊ लागला म्हणजे श्रोत्रेंद्रियाचे ठिकाणी अतींद्रिय ज्ञान (Special Sense) उत्पन्न होऊं लागले की त्यावेळी कर्णामध्ये विशिष्ट प्रकारचे ध्वनि उत्पन्न होतात त्यास

अनाहत किंवा अनुहत ध्वनि असे म्हणतात. किंकिणी, चिंचिणी, घंटानाद, वीणारव, भ्रमरगुंजारव वगैरे प्रकारचे चढते असे हे दशविध ध्वनि अगर नाद आहेत. बाह्यसृष्टींतील आघातजन्य ध्वनि श्रोत्रेंद्रियास विशिष्ट मर्यादेपर्यंतच ऐकू येतात, पण जसजसे हे चक्रभेदन होईल तसतसे अनूआहत म्हणजे आघाताशिवायच नाद कर्णामध्ये उत्पन्न होऊं लागतात म्हणून ह्या चक्रास अनाहत असे सार्थ नामाभिधान देण्यात आले आहे.

## **स्थान** - Position

शरीरशास्त्रदृष्ट्या याचे वर्णन कसे केले आहे ते पाहू. सिंपथॅटिक नर्व्हस सिस्टिमपैकी हे कार्डिॲक प्लेक्सस, पृष्ठवंशापैकी छातीचे Thoracic (थोरसिक) भागांतील जे बारा मणके आहेत त्यांतील पाचव्या सहाव्या मणक्याचे पुढचे अंगास आहे. सहज लक्षांत ठेवावयाचे म्हणजे हृदयाचे (हार्टचे) मागे हे आहे. या चक्राच्या उपयोगाचे बरोबर ज्ञान होण्यास हृदयाची रचना थोडक्यांत देणे जरूर आहे.

आपले हृदय हे दोन फुप्फुसांमध्ये डावे बाजूस साधारणपणे डावे स्तनाखाली आहे. यांत सर्व शरीरांतील अशुद्ध रक्त वरून व खालून रक्तवाहिन्यांतून येते. नंतर येथून ते फुप्फुसाकडे शुद्ध होण्यास जाते व तेथून ते शुद्ध होऊन परत हृदयांत आले म्हणजे पुनः ते सर्व शरीरभर फेकले जाते. शुद्ध रक्ताची जी मूळ थोरली वाहिनी ती फार मोठी आहे म्हणून तिला एओर्टा (किंवा महास्रोतस असे म्हणू) म्हणतात. तो प्रथम वर मानेकडे जातो,

लगेच त्यांची कमान होते. नंतर तो खाली सरळ जातो व पुढे पोटांत आल्यावर बेंबीचे खाली त्याचे दोन भाग होतात. असो.

हृदयाचे प्रथम दोन उभे भाग झाले आहेत. एक उजवा व दुसरा डावा. पुनः आडवे प्रत्येकाचे दोन दोन भाग झाले आहेत. एक वरचा व एक खालचा असे एकूण चार भाग झाले आहेत. वरच्या दोन्ही भागांस ऑरिकल्स म्हणतात. खालचे दोन्ही भागांस व्हेंट्रिकल्स म्हणतात. ऑरिकल्समध्ये अशुद्ध रक्त असते. व्हेंट्रिकल्समध्ये शुद्ध रक्त असते. हृदयास एक बाहेरून आवरण आहे व एक आंतून पातळ आवरण आहे. मध्ये खूप जाड असे स्नायू आहेत. हृदयाचे स्नायूस पोषण्याकरितां रक्तवाहिन्या व ज्ञानतंतू त्यांत पसरलेले आहेत. एवढे वर्णन विषय कळण्यास पुरेसे आहे. आता या चक्राची बारा दले (Plexuses) आहेत त्यांचे वर्णनाकडे वळूं. ती अशी :-

## दले - Plexuses

(१) Right Deep Cardiac (राइट डीप कार्डिॲक):- प्रत्येक फुप्फुसाकडे जाणारे असे श्वासनलिकेचे दोन भाग जेथे होतात त्याठिकाणी, महास्रोतसाच्या कमानीचे भागामागे हे दल आहे. उजवे फुप्फुसामध्ये याचे ज्ञानतंतू गेलेले आहेत. तसेच हृदयाच्या चार खोल्यांपैकी उजव्या बाजूचे वरचे खोलीकडे ज्यास राइट ऑरिकल म्हणतात त्याकडे याचे ज्ञानतंतू गेलेले आहेत. म्हणजे उजवे फुप्फुस व हृदयाचा उजवा कांही भाग या महत्त्वाचे अवयवांवर याचा ताबा चालतो.

(२) Left Deep Cardiac (लेफ्ट डीप कार्डिॲक):- हे दल हृदयाच्या मागच्याच बाजूस आहे. याचा ताबा हृदयाच्या डाव्या बाजूचे वरचे खोलीवर ज्यास लेफ्ट ऑरेकल म्हणतात त्यावर चालतो.

(३) Antirior Pulmonary (अँटीरिअर पल्मोनरी):- फुफ्फुसासारख्या अत्यंत महत्त्वाच्या अवयवास व त्याचे आवरणास ज्यास फ्ल्यूरा (Pleura) असे म्हणतात, त्याकडे यांतून ज्ञानतंतू गेले आहेत.

(४) Postirior Pulmonary (पोस्टिरिअर पल्मोनरी):- यांतूनही फुफ्फुसाकडे व त्याचे आवरणाकडे ज्ञानतंतू गेले आहेत.

(५) Superficial Cardiac (सुपरफिशिअल कार्डिॲक):- हे दल महास्रोतसाचे खाली आहे. त्यांतून हृदयाचे बाह्य आवरण - पेरिकार्डियम असे ज्यांस म्हणतात - त्याकडे ज्ञानतंतू जातात.

(६) Cardiac Ganglian of Wrisberg (कार्डिॲक गँग्लिअन):- वरच्याचे अगदी शेजारी हे दल आहे.

(७) Right Coronary (राइट करोनरी):- हे दल वरच्या दलाचे मागचे भागास आहे. प्रत्यक्ष हृदयाचे स्नायूस ज्या रक्तवाहिन्यांच्यायोगे पोषण होते अशा करोनरी नावाच्या रक्तवाहिन्या (Coronary Arteries) आहेत. त्यापैकी उजव्या रक्तवहिनीस या दलांतील ज्ञानतंतूंचा पुरवठा होतो.

(८) Ventricular (व्हेंटिक्युलर):- हृदयाच्या खालच्या खोल्या - ज्यास व्हेंट्रिकल्स असे म्हणतात यावर या ज्ञानतंतूचा ताबा चालतो.

(९) Left Coronary (लेफ्ट करोनरी):- हे दल पुढचे बाजूचे आहे. हृदयास पोषण करणारी अशी डावी रक्तवाहिनी आहे तीस याकडून ज्ञानतंतू जातात.

(१०) Endocardiac (एंडोकार्डिॲक):- हृदयाचे बाजूचे पातळ आवरण ज्यास एंडोकार्डिअम असे म्हणतात त्यास या दलांतून ज्ञानतंतूंचा पुरवठा होतो.

(११) Remak (रेमॅक):- प्रत्यक्ष हृदयाचे भागांत हे दल आहे. याचा ताबा हृदयाचे स्नायूंवर व त्यायोगे हृदयाचे क्रियांवर चालतो. हे दल बिघडल्यास हृदयाची क्रिया बंद पडेल.

(१२) Bidders Ganglia (बिडर्स गॅंग्लिया):- वरीलप्रमाणे हृदयाचे आंतील भागास हे आहे. ज्याप्रमाणे दुहेरी पाकळ्यांचे कमळ असते त्याप्रमाणे हे हृत्कमल आहे. याच्या ह्या दोन आंतील पाकळ्या आहेत. या दलाचा ताबा हृदयावर चालतो. हे दल बिघडल्यास हृदयाची क्रिया फार जलद चालते.

वरील वर्णनावरून असे सहज दिसून येईल की ह्या चक्राने हृदय अंतर्बाह्य व्यापून टाकिले आहे! या चक्राचा ताबा हृदय व फुप्फुस या छातीतील अत्यंत महत्त्वाचे अवयवांवर व त्यांचे आवरणावर चालतो. यांची क्रिया बंद पडणे अगर सुरू होणे

ह्या गोष्टी ह्या चक्रावर अवलंबून आहेत. या ज्ञानचक्रातील ज्ञानतंतूंचे इंद्रियविज्ञान शास्त्रामध्ये फार महत्त्वाचे वर्णन केले आहे. या चक्रावर ताबा मिळविणे जरूर आहे.

थेट मेंदूपासून निघालेल्या Vegas (व्हेगस) नांवाच्या अत्यंत महत्त्वाच्या ज्ञानतंतूबरोबर या चक्रांतून ज्ञानतंतू गेले आहेत. यावरून ह्याचे महत्त्व कळून येईल. अशा या अत्यंत महत्त्वाचे चक्रावर ताबा मिळवणे जरूर नाही काय?

आपल्या शास्त्रानुसार याचे काय वर्णन आहे ते आता पाहूं :-

अनाहत हे चवथे मोठे ज्ञानचक्र आहे. हे हृदयाचे ठिकाणी असल्यामुळे ह्यास हृत्कमल असे नाव आहे. हे द्वादशदलांकित आहे.

**द्वादशारं महाचक्रं हृदये चाप्यनाहतम्॥**

**- योगशिखा ५:९**

असे योगशिखा, योगचूडामणि, ध्यानबिंदु वगैरे उपनिषदांत म्हटले आहे. या कमलास बारा पाकळ्या आहेत. या प्रत्येक पाकळीत अनुक्रमे 'क' पासून 'ठ' पर्यंत - क, ख, ग, घ, ङ, च, छ, ज, झ, ञ, ट, ठ,- वर्ण आहेत. ह्या मातृका किंवा ही बीजे होत. प्राणवायु येथे राहतो. श्वासोच्छ्वासाची क्रिया व शरीरात चैतन्य - प्राण राखणे ह्या क्रिया ह्या वायूच्या होत.

व्यावहारिक दृष्ट्या प्राणवायु हाच मुख्य मालक असल्यामुळे मनुष्य स्वाभाविकपणे माझा प्राण असे जेव्हां शब्द उच्चारतो तेव्हां तो हृदयास बोट अगर हात लावून दाखवितो! मनाचेही वास्तव्य ह्याचे शेजारीच आहे. ज्यावेळी मणिपूर चक्रावरून

मूळ वायु वर येत जातो तेव्हां ह्या हृत्कमलावर त्याचे प्राण व मन असे स्पष्ट दोन विभाग झालेले दृष्टोत्पत्तीस येतात म्हणून ह्या कमलाचे ठिकाणी प्राण व मन यांचा निरोध करून त्यांचा लय करावा असे अमृतबिंदु, मैत्रायणीय उपनिषदांत सांगितले आहे.

**तावदेव निरोद्धव्यं यावत् हृदि गत क्षयम्।**

**एतज्ज्ञानं च ध्यान च शेशो न्यायश्च विस्तरः॥**

**- अमृतबिंदु ५**

**- मैत्रायणीय ६:३४**

अर्थ :- हृदयस्थ साक्षीरूप जो आत्मा त्याचे ठिकाणी संपूर्ण लय होईपर्यंत मनाचा रोध करावा. हेच ज्ञान व हाच मोक्ष! ह्यावरून बाकी सर्व ग्रंथविस्तार होय.

उपवायूंपैकी देवदत्त या नांवाचा वायु येथे राहतो. ह्याचे कार्य जांभई येणे, निद्रादि कर्मे करणे असे आहे. पश्यंति वाणीचे हे स्थान आहे. मनांतले मनांत स्पष्ट उच्चार आपणांस करता येतो ती पश्यंति वाणी होय. हिची स्पष्ट जाणीव आपणांस होते. या वाणीने जप करावा व तोच जप श्रेष्ठ होय असे शास्त्रांत सांगितले आहे. नाभिकमलावर श्रीविष्णूचे दर्शन घेतल्यावर या कमलावर महेशाचे दर्शन होणे क्रमप्राप्तच आहे. श्रीशंकर हा हिमाचलवासी असल्यामुळे त्याचे निवासस्थानाचे शुक्ल रूपांत वर्णन असणे साहजिकच आहे, सप्तपुरींपैकी मथुरा ही नगरी येथे आहे असे मानिले आहे. तसेच सप्तवारांपैकी शुक्रवार - हे अत्यंत तेजस्वितेचे लक्षण आहे - येथे समजला जातो. ह्या कमलाचे प्रत्येक पाकळींत एक एक शक्ति व एक एक आनंद

मानिला आहे. अशा प्रकारे १२ शक्ति येथे वास्तव्य करीत आहेत व द्वादश प्रकारच्या आनंदाचा येथे उपभोग मिळतो. या शक्तींची व आनंदांची नांवे कोष्टकांत पहावीत. येथे स्वरूपता ही मुक्ति समजली जाते.

Cervical Plexus
५ विशुद्ध-चक्र दलें १६
अं
आ
इं
ई
ल
ऋ
ऐ
ए
ओ
औ
अः
अं
ऋ
ऊ
उ
द्वार का
शनि वार
कंठ

## प्रकरण ६ वे

# विशुद्ध चक्र - Cervical Plexus

**कंठकूपे विशुद्धयाख्यं यच्चक्रं षोडशारम्।**
**पीठं जालंधरं नाम तिष्ठत्यत्र सुरेश्वर॥**

**- योगशिखोपनिषद् १-१७४**

सप्त ज्ञानचक्रांपैकी कंठस्थित पाचवे विशुद्ध चक्र अत्यंत महत्त्वाचे आहे. मणिपूर व अनाहत चक्राचे भेदन करून प्राण कंठाचे ठिकाणी या चक्रावर येतो. नंतर तेथून आज्ञाचक्रावर जाऊन मग शेवटी सहस्रदलकमलांत जातो असे क्षुरिकोपनिषदांत सांगितले आहे.

**तद्भित्वा कंठमायाति तन्नाडी पूरयोदिति।**

**- क्षुरिकोपनिषद् ११**

टीका :- तत् हृदयपंकजं भित्वा कंठम् तद्‌गत विशुद्धिचक्र याति। ततो भ्रूमध्यं आज्ञाचक्र ततः सहस्रारचक्रंच।

ध्यानधारणादि मनोलयाचे अभ्यास राजयोगानुरूप जे करीत असतील त्यांचा प्राण, या विशुद्ध चक्रावरून जातो. पण हटयोगाचा जे अभ्यास करीत असतील त्यांचा प्राण पश्चिम मार्गाने वर जातो. कंठामध्ये जालंधर बंध करावा व प्राण पश्चिम मार्गाने वर न्यावा. श्रीहाट, गोल्हाट, वेणुगुंफा वगैरे मार्गाने आज्ञाचक्रावर तो आणावा. यावरून असे दिसून येईल कीं हटयोग व राजयोग यामध्ये प्राणाची गति या चक्रापासून भिन्न

होते. कोणत्याही पद्धतीने गेले तरी आज्ञाचक्रावर यावे लागते व तेथून लगेच सहस्रदलकमलांत प्रवेश करावयाचा असतो.

पुढे दिलेल्या वर्णनावरून असे दिसून येईल की, या चक्रांचा ताबा पंच ज्ञानेंद्रियांवर ब इतर महत्त्वाचे अवयवांवर चालतो. कंठामध्ये असणाऱ्या सर्व रक्तवाहिन्यांवर तसेच श्वासनलिका, अन्ननलिका, तोंड, जिव्हा, दांत, तालु, डोळे, थायरॉइड वगैरे अत्यंत महत्त्वाच्या अवयवांच्या क्रियेवर याचा ताबा चालतो. या चक्रापासून फुप्फुसे, हृदय, व घसा यांकडेही कांही ज्ञानतंतू गेले आहेत हे लक्षांत घ्यावे. आपल्या घशांत सात द्वारे येऊन मिळाली आहेत म्हणून यास सप्तपथ असे म्हणतात. यास इंग्रजींत Pharynx (फॅरिंग्ज) असे म्हणतात. याचे महत्त्व फार आहे. आपल्या जिभेच्या खालचा व मागील भाग जेथे खाली चिकटलेला आहे तेथे थोडेथोडे कापावयाचे व जिभेचा शेंडा हातांत धरून जीभ हळूहळू पुढे मागे व बाजूस ओढावयाची म्हणजे ती लांब होते. ह्या क्रियेस लंबिकायोग म्हणतात. हा योग कित्येक वर्षांनी साध्य होतो. तो साध्य झाला म्हणजे जीभ उलटी करून ती घशांत घालावयाची म्हणजे घशांतील नाक कानादि सात द्वारे बंद होतात. यास हटयोगांत खेचरी मुद्रा म्हणतात. ही खेचरी मुद्रा साध्य झाल्यावर व कंठाचे ठिकाणी जालंधर बंध बांधल्यावर प्राणास विशिष्ट मार्गानेच म्हणजे पश्चिम मार्गानेच जाणे भाग पडते. तसा तो गेला म्हणजे मग तो आज्ञाचक्रावर येतो, नंतर सहस्रदलकमलांत प्रवेश करितो व समाधि साध्य करून देतो! अशा महत्त्वाचे चक्रावर ताबा

